**महात्मा गांधी तंटामुक्त गांव मोहिम**

मोहीमेचा प्रचार व प्रसिद्धी यासाठी आकाशवाणी दूरदर्शन वरुन दि. १२/८/२०१० ते दि. १५/८/२०१० या कालावधीत दिलेल्या जाहिरातीच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक-तंमुगा १०१०/प्र.क्र.७७/२०१०/पोल-१५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक - ३० मार्च, २०११.

**शासन निर्णय** - सन २०१०-११ या चौथ्या वर्षाची मोहीम दि. १५/८/२०१० पासून सुरु झाली असून या मोहीमेत जास्तीत जास्त ग्रामपंचायतींनी सहभाग घ्यावा यासाठी ग्रामपंचायतींना त्याची माहिती होण्यासाठी मोहीमेची जाहिरात दि. १२/८/२०१० ते दि. १५/८/२०१० या कालावधीत विविध दृकश्राव्य माध्यमांद्वारे प्रसारित करण्यात आली होती. त्यासंबंधीची देयके जाहिरात प्रसारीत करणाऱ्या आस्थापनांकडून प्राप्त झाली आहेत. या देयकांची तपासणी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने दिलेल्या कार्यादेशानुसार करण्यात आली असून कार्यादेशात नमुद केलेल्या दराप्रमाणे देयकांची आकारणी करण्यात आली आहे. त्यानुसार खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मोहीमेच्या जाहिरातीकरीता एकूण रुपये ६,३९,९९६/- **(रुपये सहा लाख एकोणचाळीस हजार नऊशे शहाण्णव फक्त)** इतक्या खर्चास मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र | जाहिरात प्रसारीत करणाऱ्या संस्थेचे नाव | जाहिरातीचा तपशील | देयक क्रमांक | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | ई टिव्हि. मराठी, हैद्राबाद, रामोजी फिल्मसिटी | मायकेल व बॉब या मराठी कार्यक्रमातून मध्यांतरात ६० सेकंदाची जाहिरात प्रसारीत केली. | ०२००५४९३४ दि.१५/८/२०१० | १४२,१०१.७२ |
| २ | दूरदर्शन केंद्र, वरळी, मुंबई | सायंकाळी ७.०० व रात्री ९.३० च्या बातम्यांच्या मध्यांतरास प्रत्येकी ६० सेकंद | एमयुएम/७२/एसीसी/ ऑग/२०१०, दि. १४/९/२०१० | ३५९,८५४.०० |
| ३ | आकाशवाणी, मुंबई (पुणे पी सी) | ३० सेकंदाची जाहिरात | पीयुएनई/ऑगस्ट/१०/७ /एसीसी, दि. ऑगस्ट, २०१० | ४९,५००.०० |
| ४ | आकाशवाणी, मुंबई (मुंबई पी सी) | ३० सेकंदाची जाहिरात | एमयुएम/पीसी/०५/ ऑगस्ट/१०/एसीसी, दि. ऑगस्ट, २०१० | ४९,५००.०० |
| ५ | झी न्यूज लिमीटेड, (झी २४ तास) | आजचा महाराष्ट्र या कार्यक्रमातून मोहीमेची ६० सेकंदाची जाहिरात | क्र. ४०००००६८५३/१०-११, दि. १५/८/२०१०. | ३९,०४०.०० |
| | | | **एकूण-** | **६३९,९९५.७२** |

**(रुपये सहा लाख एकोणचाळीस हजार नऊशे पंच्याण्णव व बाहत्तर पैसे फक्त) म्हणजेच (रुपये सहा लाख एकोणचाळीस हजार नऊशे शहाण्णव फक्त)**

२. प्रमाणित करण्यात येते की, सदरहू खर्च यापुर्वी अदा करण्यात आलेला नाही.

३. प्रस्तूत खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुन करण्यात आला आहे.

४. याखाली होणारा खर्च रुपये ६,३९,९९६/- **(रुपये सहा लाख एकोणचाळीस हजार नऊशे शहान्नव फक्त)** गृह विभाग, मागणी क्रमांक-बी-१ " प्रधान लेखाशिर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गांव मोहिम (२०५५ ०५३३) २६-जाहिरात व प्रसिध्दी " याखालील सन २०१०-११ या वर्षीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. प्रस्तूत खर्चाची देयके पारित करण्यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०३३०१३१६४७००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि. फ. वसावे)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थ-२ व अर्थ-११), मंत्रालय, मुंबई,
निवडनस्ती, पोल-१५

********